सोयगाव पंचायत समिती (जि. औरंगाबाद) येथील अधिकारी व कर्मचारी यांचेसाठी निवासस्थान (टाईप II) इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

## महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०२१/प्र.क्र.७६/बांध-४
५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख : ०५ जानेवारी, २०२२

**वाचा:-**

१. **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांकः** जिपऔ/बांधकाम/ कावि /पीबीआर-३/ /७७/२०२१, दिनांक १५ फेब्रुवारी, २०२१.
२. **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांकः** जिपऔ/बांध/ कावि /पीबीआर-३/ /२७०७/२०२१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०२१.

**प्रस्तावना:-**

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ व २ येथील पत्रांन्वये पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) येथे पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावानुसार एकूण २००४.६३ चौ.मी. इतक्या क्षेत्रफळाची एकूण ३० निवासस्थाने, सि.स.क्र. ६१४, ६९७, ६१९, ६१५, ६१६, ६०३, ६१७, ६१८ व ६२० मध्ये बांधण्याचे प्रस्तावित आहे. त्यामुळे पंचायत समिती सोयगाव यांच्या मागणी व गरजेनुसार टाईप II प्रकारातील ३० निवासस्थानांच्या बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे.

०२. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) निवासस्थान बांधकामाकरीता उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि., औरंगाबाद यांच्या कडील नमुना नकाशा टाईप- II जॉब क्र. टी - डीएएन/आरईएस - १९ उपयोगात आणला आहे. यासाठी सन २०२०-२१ च्या दरसूचीवर आधारीत एकूण रू.१०८३.०० लक्ष किंमतीचे ढोबळ अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, औरंगाबाद, अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, औरंगाबाद व मुख्य अभियंता, सा.बां.वि. औरंगाबाद, यांनी साक्षांकीत केलेले आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी प्रस्तावासोबत नमुना नकाशाची प्रत, जागेचा उतारा, टाईप प्लॅन इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

०३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप II प्रकारातील ३० निवासस्थान बांधकामाच्या एकूण रु.१०,८३,००,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) येथील अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप II प्रकारातील ३० निवासस्थानांच्या बांधकामाच्या एकूण रु.१०,८३,००,०००/- (रूपये दहा कोटी त्र्याऐंशी लक्ष फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) येथील निवासी इमारत बांधकामाचे ढोबळ अंदाजपत्रक सादर केले आहे. यास्तव या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास प्रथमत: सक्षम प्राधिकाऱ्याकडून मान्यता घेणे बंधनकारक राहील.
२. पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप I प्रकारातील ६, टाईप III प्रकारातील २ व टाईप IV प्रकारातील २ निवासस्थानांच्या इमारतींचे बांधकाम ज्या जागेवर करावयाचे आहे, ती जागा प्रथमत: जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या स्वत:च्या नावावर करून घेणे बंधनकारक राहील.
३. नियोजित निवासस्थान इमारतीचे बांधकाम जुनी इमारत पाडून करावयाचे असल्यास, बांधकाम सुरू करण्यापुर्वी संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, प्रादेशिक विभाग यांच्याकडून प्रथमत: अस्तित्वातील जुन्या इमारतीचे स्ट्रक्चरल ऑडीट करून घेण्यात यावे, त्यानुसार अस्तित्वातील इमारत वापरण्यास अयोग्य असावी.
४. पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप I प्रकारातील ६, टाईप III प्रकारातील २ व टाईप IV प्रकारातील २ बांधकामाकरीता, प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यास बांधकाम सुरू करण्यापुर्वी प्रथमत: मुख्य वास्तुशास्त्रज्ञ/प्रादेशिक उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांची मान्यता घेणे तसेच अग्निशमन यंत्रणेची मंजूरी घेणे आवश्यक राहील.
५. नियोजीत निवासी इमारतीचे बांधकाम हे सार्वजनिक बांधकाम विभाग (अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, औरंगाबाद) या यंत्रणेमार्फत करण्यात यावे.
६. विहीत नमुना आराखड्यानुसार कामे हाती घेताना, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास प्रथमत: सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेणे बंधनकारक राहील.

८. प्रस्तुत निवासी इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

९. प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही - २०१३ / प्र. क्र. १७७ / तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१०.प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, औरंगाबाद यांनी दक्षता घ्यावी.

११.या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, औरंगाबाद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो सबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

०२. पंचायत समिती, सोयगाव (जि. औरंगाबाद) येथील निवासी इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| **General Abstract for Construction of Government Quarters Type II P. S. Soyegaon, Dist. Aurangabad** | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost In Rs.** |
| 1 | A) Cost of Residential Quarters Type II | 57178193.00 |
| | B) Drainage Line | 3000000.00 |
| | C) Cement Concrete Road | 4000000.00 |
| | D) Parking Shed | 2000000.00 |
| | E) Paving Blocks | 3000000.00 |
| | **Total (A to E)** | **69178193.00** |
| 2 | Add 1 % For SQM Charges | 778255.00 |
| 3 | Add 13 % for Electrification | 10117311.00 |
| 4 | Add for Street light | 2500000.00 |
| 5 | Add for Gardening & Land scaping | 500000.00 |
| 6 | Add for External water supply & Drainage | 1500000.00 |
| 7 | Add for Fire Fighting arrangement | 2000000.00 |
| 8 | Add for Rain water harvesting | 1000000.00 |
| 9 | Add 5 % for Contingency | 3891273.00 |
| 10 | Add 3 % for Computerisation | 405147.00 |
| 11 | Add 10 % for Price Escalation | 7782547.00 |
| 12 | Add 0.5 % for Labour Insurance | 345891.00 |
| 13 | Add 12 % for GST | 8301383.00 |
| | **Grant Total** | **108300000.00** |
| | **Says Rs.** | **10,83,00,000/-** |

०३. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

०४. उपरोक्त बांधकामासाठी सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (BDS) संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना वितरीत करण्यात येईल. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी शासनाकडून त्या-त्या वर्षात उपलब्ध होणारा निधी संबधित वर्षात सार्वजनिक बांधकाम विभाग, अधीक्षक अभियंता, सां.बा. मंडळ, औरंगाबाद यांच्याकडे वर्ग करण्याची दक्षता घ्यावी. यावरील खर्च "२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ १२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०५. प्रस्तुतचा शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक सं. क्र.५७९/२१/व्यय-१५, दिनांक २५ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या प्राप्त अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२३०१७१९११७३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24,
cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2022.01.05 15:36:29 +05'30'

**(प्रविण जैन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद.
२) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
५) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
८) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२ नागपूर.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१०) अधीक्षक अभियंता, सां.बा. मंडळ, औरंगाबाद.

११) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१२) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१३) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा औरंगाबाद.
१६) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
१७) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१८) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद.
१९) सभापती, पंचायत समिती, सोयगाव, जिल्हा औरंगाबाद.
२०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सोयगाव, जिल्हा औरंगाबाद.
२१) निवड नस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग,मंत्रालय मुंबई.